सन २०२०-२१ या वित्तिय वर्षामध्ये औषधे, वैद्यकिय उपकरणे, यंत्रसामुग्री व तदअनुषंगीक उपभोग्य वस्तु व इतर आवश्यक साहित्याची खरेदीसाठी सुधारित प्रशासकिय मान्यता देण्याबाबत. (सॅनिटरी नॅपकीन)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.३१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २२ मार्च, २०२२.

वाचा :-

१. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे यांचे पत्र क्र.राकुकका/किशोरवयीन आरोग्य/कक्ष ७अ/न.क्र.४१/सॅनिटरी नॅपकीन खरेदीस सुधारित प्रशासकीय मान्यता व प्रशासकीय आदेश (शासन निर्णय) निर्गमित करण्याबाबत तसेच खरेदी प्रक्रिया करणेबाबत/१७९६३-६४/२०२२, दिनांक ०९.०३.२०२२.
२. शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक-२६.७.२०१७.
३. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. प्रशामा-१२२०/प्र.क्र.३१/आरोग्य-७, दिनांक २०.१०.२०२०.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्य टिप्पणी दिनांक ०४.०३.२०२२.

प्रस्तावना:-

उपरोक्त संदर्भ क्र.३ मधील शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ या वित्तीय वर्षामध्ये वर्षात राष्ट्रीय आरोग्य अभियान पी.आय.पी नुसार विविध कार्यक्रमांतर्गत आरोग्य सेवा आयुक्तालय यांच्या अधिनस्त असलेल्या आरोग्य संस्थाना निधीच्या मर्यादेतच औषधे, वैद्यकिय उपकरणे, यंत्रसामुग्री व तदअनुषंगीक उपभोग्य वस्तु व इतर आवश्यक साहित्याची खरेदी करण्यासाठी रुपये ५२७,२५,१४,२१२/-इतक्या खर्चासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये प्रमोशन ऑफ मेन्स्ट्रुल हायजिन योजनेंतर्गत सॅनिटरी नॅपकीन या साधन सामुग्रीचा अंतर्भाव होता. आता, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे यांच्या संदर्भ क्र.१ च्या प्रस्तावानुसार सॅनिटरी नॅपकीन या बाबीच्या निविदा प्रक्रियाअंती प्राप्त झालेल्या दरानुसार नव्याने सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२०-२१ च्या मंजूर पी.आय.पी. मधील FMR Code ६.२.४.३ अंतर्गत सॅनिटरी नॅपकीन या सामुग्रीच्या एकूण ७६,८८,७८४ सॅनिटरी नॅपकीन पॅक (६ नॅपकीन्सचा १ पॅक) निविदेतील प्राप्त न्युनतम प्रति नॅपकीन पॅक दर रुपये ११.३४/- यानुसार खरेदी करण्यासाठी एकूण रु. ८७१.९० लक्ष (रुपये आठ कोटी एकाहत्तर लक्ष नव्वद हजार फक्त) इतक्या रकमेस पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून खालील तपशीलाप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| एकूण किशोरवयीन मुली (वय १४ ते १९) व आशांची संख्या | एकूण सॅनिटरी नॅपकीन पॅक (६ नॅपकीन्सचा १ पॅक) | निविदेत निश्चित झालेले दर (प्रती सॅनिटरी नॅपकीन) (रुपयात) | प्रती सॅनिटरी नॅपकीन पॅक रक्कम रुपये (६ नॅपकीनचा १ पॅक) | एकूण रक्कम (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| ६,४०,७३२ | ७६,८८,७८४ | १.८९ | ११.३४ | ८७१.९० |

**अटी :-**

१) सदर सॅनिटरी नॅपकीन या साधन सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर सॅनिटरी नॅपकीन या साधन सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार आहेत.

३) सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आली आहे.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority NPPA). National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

६) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खाजरजमा करण्यात यावी.

७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व पुरवठानंतर नमुना तपासणी /(Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

८) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

९) सदरचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियांनार्तगत मंजूर पी.आय.पी. मधील अनुदानानुसार निविदा प्रक्रीया करून वितरीत तरतूदीच्या मर्यादेतच खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच वितरीत अनुदानाच्या मर्यादेतच प्रत्येक्ष खरेदी करण्याची सर्वस्वी जबाबदारी आयुक्त तथा अभियान संचालक व संबधित कार्यक्रम प्रमुखांची राहील.

१०) सदर खरेदीची द्विरुक्ती )Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

११) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे )CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे .

१२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

१३) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -२०१६/ प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६२०१४२११२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.22 13:29:26 +05'30'

**(वि. ल. लहाने)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे.
४) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१३) निवडनस्ती (आरोग्य-७)